# श्रीपाद श्रीवल्लभ संपूर्ण चरित्रामधील कथांच्या माहितीचा तक्ता

# अध्याय 1 व्याघ्रेश्वर शर्मांचा वृत्तांत

दिगंबरा दिगंबरा श्रीपाद वल्लभ दिगंबरा।। श्रीपाद राजं शरणं प्रपद्ये।। ।दिगंबरा दिगंबरा श्रीपाद वल्लभ दिगंबरा।।

| अध्याय, पान क्र. चर्चा कोणाकोणात होत आहे? कथानक | स्थळांचा उल्लेख व नकाशा संदर्भ |
|---|---|
| अध्याय १, पान १. कथाभाग<br>आत्मनिवेदन - सिद्धमुनी व शंकरभट्ट कथनातून – कथानक - सिद्धमुनी व शंकरभट्ट संवाद होतानाचा अपेक्षित सन १३४०.<br>उडुपिच्या कृष्ण मंदिरातील आदेशानुसार कन्याकुमारी (कन्यकापरमेश्वरीचे) दर्शनाचा लाभ. | <br>उडुपि श्रीकृष्ण मंदिर |

कल्पना करा – तुम्हाला एखाद्या मंदिरातील देवतेच्या समोर उभे राहिले असताना आदेश मिळाला की अमुक अमुक नावाच्या व्यक्तीला तू या या गावी जाऊन भेट. तर प्रथम जावे किंवा नाही असा संभ्रम निर्माण होईल. कारण मंदिरात जाताना त्यानंतर काय करायचे हे साधारण ठरवून ठेवलेले असते. तरीही असे समजा की तो आदेश शब्दशःमानून तुम्ही त्या एका अज्ञाताच्या शोधात निघालात कि ज्याचे आपणास फक्त नाव व गावाचे नाव कळले आहे, तर मंदिराच्या बाहेर आल्यावरच्या पहिल्या चौकातून कुठे वळणार? डावीकडे ? उजवीकडे कि समोर ? वाट कोणाला विचारणार? कोणत्या भाषेत? अशा समस्या वाटूनही सरळ वाट फुटेल तिकडे! म्हणून आपण अशी यात्रा पायी करायचा निश्चय करून निघालात... सध्या प्रमाणे बांधलेले रस्ते नाहीत, ढाबे, उपहारगृहे, राहायच्या सोई नाहीत, मार्गदर्शक पाट्या नाहीत.... तरी पण आपण ‘काही झाले तरी मी याचा शोध घेणारच! या आपल्या निश्चयाच्या बळावर हा प्रवास चालू ठेवलात....



कन्यका कुमारी मंदिर

# श्रीपाद श्रीवल्लभ संपूर्ण चरित्रामधील कथांच्या माहितीचा तक्ता









कन्याकुमारी ते मरुत्वमलाई १० किमी - मरुत्वमलाई रमणीय पर्वत - गुहा असलेला भाग

त्या देवींच्या आज्ञेनुसार श्रीपाद श्रीवल्लभ नामक अनोळखी व्यक्तीला कुरुगड्डीला, जे नाव आणि गाव त्यांनी आयुष्य प्रथम ऐकले असावे अशा व्यक्तिमत्वाच्या दर्शनाला शंकर भट्ट तरूण अनोळखी प्रदेशातून साहसकरून पायी निघाले. वाटेत वाघ दिसतो. भितीने एका गूहेत जाताना व्याघ्रेश्वर मनुष्यरुपाचे रहस्य.... श्री सिद्ध वरेण्य-शंकर भट्टांनी दिलेले नाव- नामक वृद्ध तपस्वी - व्याघ्रेश्राचे पुर्वचरित्र कथन सांगतात - एक मठ्ठ ब्राह्मण मुलगा म्हणून निंदा. बालकरुपात बद्रिकारण्यात जायचा आदेश. एका तपस्व्यांचे त्याने शिष्यत्व, श्रींच्या अवताराची नांदी... त्याला कळली. मी कोण? पूर्वीचा वाघ-सिंहांशी लढून लोकांचे मनोरंजन करणारा बलिष्ठ पहिलवान. सध्या या गुहेतील तपस्व्यांची रक्षा करतो?

पुढे काही वर्षांनी त्याचे वाघात रुपांतर झाले व तो कुरवपुरात कृष्णा नदीच्या तीरावर पोहोचला. तिथे श्री त्याच्यावर आरूढ होत नदीपार करून त्यांच्या स्थानी पोहोचले.

या कथनावरून असे दिसते की श्रीपाद श्रीवल्लभ हे पीठापूरच्या घरातून गुप्त झाल्यावर गंगा किनाऱ्यावरील क्षेत्रसाधनाकरून बद्रीकावन, अन्य हिमालयातील तीर्थेक्षेत्रांतील साधकांना दर्शन आणि उपदेश




शंकरभट्टांनी त्या काळात जर गूगल मॅपच्या मदतीने प्रवास करायचे ठरवले असते तर तो पदयात्रेचा प्रवास साधारण असा झाला असता..यापुढील पायी मार्ग गूगल मॅवरून दाखवले आहेत.

# श्रीपाद श्रीवल्लभ संपूर्ण चरित्रामधील कथांच्या माहितीचा तक्ता

| | |
|---|---|
| देऊन अरबी समुद्र किनाऱ्यावरील गोकर्ण महाबळेश्वरात ३ वर्षे राहून श्री शैल्यास चातुर्मास करून निवृत्ती संगम म्हणजे भीमा व कृष्णा नदीच्या तीर्थक्षेत्रात कार्तिक पौर्णिमाझाल्यावर गुप्त झाले. कुरवपुर किंवा कानडीत गुरु (तेलगूत कुरू) गड्डी या कृष्णा नदीच्या पात्रातील बेटावर येऊन वास्तव्य करू लागले होते. तो दिनांक कार्तिक कृष्ण प्रतिपदा अर्थात १३ नोव्हेंबर १३४०, रविवार होता. अधिक महितीसाठी लेख पहा. | Date: November 13, 1340<br>Time: 12:35:40<br>Time Zone: 5:30:00 (East of GMT)<br>Place: 76 E 34' 00", 9 N 45' 00" Kuravapur India, India<br>Lunar Yr-Mo: Vikrama - Karthika<br>Tithi: Krishna Pratipat (Sy) [Kaameswari] (84.31% left)<br>Vedic Weekday: Sunday (Sy)<br>Nakshatra: Krittika (Sy) (10.76% left)<br>Yoga: Siva (Bu) (85.65% left)<br>संदर्भ- लीला वैभव पोथी अ ११ पान ९२,९८ |
| अत्रेयपुरम - | व्याघ्रेश्वरांचा प्रवास कसा झाला याचे नकाशा दर्शन अत्रेयपुरम ते मरुत्वमलाईचा |

# श्रीपाद श्रीवल्लभ संपूर्ण चरित्रामधील कथांच्या माहितीचा तक्ता







मार्ग

श्री कन्यका पुराण – श्रीकृष्ण कालीन अग्रसेन (आग्रावासी?) काही वाणिज्यक आन्ध्रात बृहतशीलानगरीत स्थलांतरित होऊन व्यापार करीत असत. होते. त्यात कुसुमश्रेष्ठी नामक धर्मशील दंपती व हितचिंतक मित्र भास्कर राहात. त्यांचे आडनाव पैंडा असे आहे. तुझी भेट त्यांच्या वंशातील लोकांशी होईल. कुरवपुरात जा. म्हणून अंतर्धान झाले. शंकर भट्ट पुढील प्रवासाला लागले.

।। श्रीपाद श्रीवल्लभांचा जय जय कार असो ।।

# अध्याय २ सिद्ध योगिंद्र दर्शन - विचित्रपुरचा वृतांत

दिगंबरा दिगंबरा श्रीपाद वल्लभ दिगंबरा।। श्रीपाद राजं शरणं प्रपद्ये।। ।दिगंबरा दिगंबरा श्रीपाद वल्लभ दिगंबरा।।

| अध्याय, पान क्र. चर्चा कोणाकोणात होत आहे? कथानक | स्थळांचा उल्लेख व नकाशा संदर्भ  |
| --- | --- |
| अध्याय २ पान ७ कथाभाग सिद्धयोगिंद्र व शंकरभट्ट - उडुपीहून शंकर भट्ट कसे कन्याकुमारीला पोहोचले. नंतर मरुत्व मलाईहून मदुराईच्या जवळ पोहोचले. प्रथम जंगलातील व नंतर रत्नजडित शिवलिंग (अतिप्राचीन) आणि **कदंबवन**<br>सध्याची सम्पन्न नगरी एकाच वेळी दिसली ते काय झाले होते याचा खुलासा... धनंजय व्यापाऱ्याच्या सांगण्यावरून कुलशेखरपांड्य राजाने मदुराई शहर वसवले. नंतर धनंजय कुसुमश्रेष्ठी म्हणू जन्मला. इथे काही दैवी रहस्ये दडली आहेत. | मदुरै समीप वेदवती म्हणजेच सध्याची (वैगई)नदी |

# अध्याय ३ पळनी स्वामी दर्शन - कुरवपुर संदर्शन

दिगंबरा दिगंबरा श्रीपाद वल्लभ दिगंबरा।। श्रीपाद राजं शरणं प्रपद्ये।। ।दिगंबरा दिगंबरा श्रीपाद वल्लभ दिगंबरा।।

| अध्याय, पान क्र. चर्चा कोणाकोणात होत आहे? कथानक | स्थळांचा उल्लेख व नकाशा संदर्भ |
|---|---|
| राजा, राजदूत, समयपुरम (विचित्रपुर?)<br>अग्रहारपुरम अंगराई असा तर्क.<br>पुर्वी भेटलेले राजदूत पुन्हा विचित्रपुरमला घेऊन गेले राजाने सत्कार केला. अग्रहारपुरमला माधव नंबूद्री ब्राह्मण भेटला व कुरवपुरास येतो म्हणू लागला. त्याने त्यांचे नंबुद्री ब्राह्मण हे नाव कसे पडले ते सांगितले..<br>गर्तपुरी(गुंटूरच्या नंबूरू गाव तेथून काही ब्राह्मण मल्याळम प्रांतात गेले. त्यांना तेथील स्थानिक नंबूरूहून आलेले म्हणून नंबुद्री म्हणत असत. |  |

# श्रीपाद श्रीवल्लभ संपूर्ण चरित्रामधील कथांच्या माहितीचा तक्ता

| | |
|---|---|
| | सात शे वर्षांनंतर विचित्रपुरम नावाचे गाव वगळता सर्व गावांच्या नावांचा आजही शोध लागतो. |
| गर्तपुरी (सध्याच्या गुंटूर जवळच्या) नंबूरूंचा प्रवास<br>१. कणसिद्धांतकथन<br>२. ब्रह्मकमळस्वरूप<br>३. माधव आणि एका तरुणास जमिनीत १० दिवस गाडतात.<br>४. नागलोक ५. अनघालक्ष्मीसह<br>६. दत्तात्रेयदर्शन. | <br><br>नंबुरूहून कालडी या मल्याळम प्रदेशात स्थलांतर |

।। श्रीपाद श्रीवल्लभांचा जय जय कार असो ।।

# अध्याय 4 कुरवपूरला वासवांबिकेचे दर्शन

दिगंबरा दिगंबरा श्रीपाद वल्लभ दिगंबरा।। श्रीपाद राजं शरणं प्रपद्ये।। ।दिगंबरा दिगंबरा श्रीपाद वल्लभ दिगंबरा।।

| अध्याय, पान क्र. चर्चा कोणाकोणात होत आहे? कथानक | स्थळांचा उल्लेख व नकाशा संदर्भ |
|---|---|
| अध्याय ४. पान २७ कथाभाग<br>पलनीस्वामी पुढे शिवशर्मा व अंबिका जोडप्याची कथा शंकर भट्टांना सांगतात.<br><br> | <br>कुरवपुराचा पैलतीर<br>२. कुरवपुरात एक जोडपे नदीच्या पैलतिरावर राहात असत. मंदबुद्धीच्या मुलामुळे वैतागलेले वडील शिवशर्मा श्रींना विनवू लागले तेंव्हा तू लवकरच मृत्यू पावल्यावर धीशीला नगरात निंबवृक्षाखाली |

धीशिला नगरी सध्याची शिर्डी

३. तिरुमलदास सांगतात की एकदा स्नानानंतर काठावर श्रींनी योगाग्नीतून वासवी कन्यकाम्बा नामक हुबेहूब दिसणारी आदिशक्ती अवतरली. तिच्या समोर श्रींनी अनेक संकल्प सोडले.

भूगर्भात तपश्चर्या करशील व नंतर तिथेच अवतारी जन्म घेशील असे वर्तवले. अंबिकेला शिवपूजेचे फळ म्हणून मीच तुझ्यापोटी जन्म घेईन असा आशीर्वाद दिला. ते म्हणजे नरसिंह सरस्वती...जन्म. १३८०

४. नरसिंह सरस्वतींचे१३८० (१४ January १४५९) : निजानंदगमन श्रीशैल्यकदली वनांत




आलेल्या अदभूत अनुभवांनी भारावून जाऊन मला गुरूच्या दर्शनाची व आलेले अनुभव ग्रंथित करायची अनुमती मिळावी असे मनांत आले. तो भाव ओळखून पलनीस्वामी म्हणाले, मी ओळखले तुझ्या मनांतील भाव. श्रींच्या  आशीर्वादाने तसेच घडो.

पीठिकापुरम मधील तीर्थस्थाने



# श्रीपाद श्रीवल्लभ संपूर्ण चरित्रामधील कथांच्या माहितीचा तक्ता




अक्कलकोट




गाणगापुर

५. गुरूदत्त ⇨ श्रीपादवल्लभ ⇨ नरसिंह सरस्वती. ⇨ स्वामी समर्थ...

१. मी हा अवतार ३०व्या वर्षी संपवेन (सन १३५०)

२. नृसिंहरस्वती नाही पुढील अवतारात ८० वर्षे राहून कदली या दलदलीच्या वनांत गुप्त होईन (सन १३७८ ते १४५८)

३. ३०० वर्षांच्या नंतर स्वामी समर्थ नावाने अवतरेन (सन १८५६ ते १८७८)

६. नरसिंह सरस्वतींच्या जीवन घटना-

शके१३०० (१३७८ सन) : जन्म लाडाचे कारंजा

१३०७ (१३८५) : उपनयन ७वे वर्ष

१३०८ (१३८६) : घरातून बाहेर ८वे वर्ष

१३१० (१३८८) : सन्यास पत्करला काशीमधे १०वे वर्ष

१३३८ (१४१६) : घरी परतले लाड कारंजे ३८वे वर्ष(२२वर्षांनी)

# श्रीपाद श्रीवल्लभ संपूर्ण चरित्रामधील कथांच्या माहितीचा तक्ता



स्वामी समर्थ



नरसिंह सरस्वती

१३४० (१४१८) : गौतम तटाक यात्रा ४० वे वर्ष

१३४२ (१४२०) : परळीवैजनाथ वास

१३४३ (१४२१) : औदुंबर वास (भिलवडी) ४ महिने

१३४४-१३५६(१४२२ -१४३४) नरसोबावडीत ५६ वे वर्षापर्यत १२ वर्षे

१३५७-१३८० (१४३५ -१४५८) : गाणगापूरवास ८० पर्यंत २४ वर्षे

७. ध्रूव येशूच  माझा पिता असे म्हणतो तो नारायण मीच.

शंकर पलनीस्वामींना म्हणाले की याच कथानकात साईबाबा ३ दिवसा करता गुप्त होतात व कलकत्यातील काली मातेच्या गदाधराला(रामकृष्ण परमहंस) पुजारकास आशीर्वाद देऊन व कालीमातेच्या(कलिका माता) व श्रीपादांच्या शक्तीपाताने प्रेरित होईन परत येतात)

मला ध्यानात ‘अल्ला मालिक’ म्हणणारे फकीर दिसले ते कोण? ते श्रीपाद श्रीवल्लभ होते. तू त्यांना यवनवृद्धाच्या( साईबाबा रुपात?) पाहिलेस.

| | |
|---|---|
| Date: | May 27, 1340 |
| Time: | 6:50:40 |
| Time Zone: | 5:30:00 (East of GMT) |
| Place: | 82 E 12' 00", 16 N 55' 00" |
| | Pithapuram, India, India |
| Lunar Yr-Mo: | Vikrama - Adhika Jyeshtha |
| Tithi: | Krishna Ashtami (Ra) [Tvarita] (57.71% left) |
| Vedic Weekday: | Friday (Sk) |
| Nakshatra: | Poorvabhadra (Gu) (99.49% left) |
| Yoga: | Vishkambha (Sa) (17.05% left) |

# श्रीपाद श्रीवल्लभ संपूर्ण चरित्रामधील कथांच्या माहितीचा तक्ता

| | |
|---|---|
| | <br>साईबाबा आपल्या आवडत्या शिळेवर |
| ८. जर्मनीहून त्या काळात कुरवपुरात? एक जॉन नामक व्यक्ती भेटला. तो जर्मन भाषेत तर श्री तेलुगुमधून बोलताना दिसले. ... कालांतराने जर्मन भाषेत ही पोथी प्रकाशित होईल. वगैरे आशीर्वाद घेऊन तो परतला....पलनीस्वामींना सूक्ष्मदेहातून स्थूल देहात जायचा आदेश दिला | ९. (पीठीकापुरमहून?) श्री अदृष्य होण्याची जो वार होता तो नेमका आज शुक्रवार कृष्ण अष्टमी दि २७ मे १३४0 साली आहे. याची नोंद करायला सांगून पलनीस्वामींना जायचा आदेश दिला... |

| | |
|---|---|
| Date: | May 25, 1336 |
| Time: | 13:50:40 |
| Time Zone: | 5:30:00 (East of GMT) |
| Place: | 82 E 12' 00", 16 N 55' 00" Pithapuram, India, India |
| Lunar Yr-Mo: | Dhaata - Jyeshtha |
| Tithi: | Sukla Sapthami (Sa) [Siva Dooti] (59.50% left) |
| Vedic Weekday: | Friday (Sk) |
| Nakshatra: | Magha (Ke) (53.13% left) |
| Yoga: | Harshana (Sy) (82.72% left) |

१0. पान २२. पलनीस्वामी सांगतात    महामति कोण? (महंमद पैगंबर)

दत्त तत्वाचा भाग यवन धर्म. 'महामति' नामक आत्मा निराकार मख्खेष्वराचा भक्त. तो देवाला 'अल्ला' म्हणायचा.



| | |
|---|---|
| | मक्कामधील काबातील संगे (पत्थर) अस्वद (काला) |
| ३१. पान २९. पलनीस्वामींच्या भेटीतून आलेल्या अदभूत अनुभवांनी भारावून जाऊन मला गुरूच्या दर्शनाची व आलेले अनुभव ग्रंथित करयाची अनुमती मिळाली असे मनांत आले. तो भाव ओळखून पलनीस्वामी म्हणाले, मी ओळखले तुझ्या मनांतील भाव. श्रींच्या आशीर्वादाने तसेच घडो.<br>३२. ३३. माधव नंबूद्री जे सोबत होते, ते म्हणाले, 'मला ध्यानात कौपिन धारी संन्यासी दिसले. बेटा माधवा, तू पाहिलेले घटनाचक्र, चरित्रामृताची प्रत, नारळ, चामड्याचे जोडे, अवधूताचा अपमान वगैरे नंतरच्या घटनांची चुणुक होती. | ३२. माधव नंबूद्री, गाडलेल्या नवयुवकाचे शव बाहेर काढायला सांगितले. शवात प्राण आले. नव्या तरुणाच्या शरीरातील पलनीस्वामी म्हणाले, 'माधवा, तू विचित्रपुराला जा. सुक्ष्म रूपातील पीठापुरचे दर्शन तुला पुरे आहे'. शंकरा, तू तिरुपतीला जा'. वृद्ध रूपातील जीर्ण शरीराची विल्हेवाट नदीत विसर्जितकरून व्याघ्रेश्वर निघून गेला. अध्याय ४ समाप्त |

।। श्रीपाद श्रीवल्लभांचा जय जय कार असो ।।

# अध्याय 5 शंकर भट्ट तिरुपतीस पोहोचणे, कणिपाकात तिरुपतीदासांची भेट

दिगंबरा दिगंबरा श्रीपाद वल्लभ दिगंबरा।। श्रीपाद राजं शरणं प्रपद्ये।। ।दिगंबरा दिगंबरा श्रीपाद वल्लभ दिगंबरा।।

| अध्याय, पान क्र. चर्चा कोणाकोणात होत आहे? कथानक | स्थळांचा उल्लेख व नकाशा संदर्भ |
|---|---|
| अध्याय ५, पान ३३, कथाभाग<br>१. बालयतिच्यारुपात श्रीपादांची अनुमती शनिदेव परवानगी घेऊन? साडेसाती सुरू करतात<br>कर्मविपाक सिद्धांत सुक्ष्म व अढळ असतो. हे जाणून सत्कर्म करावे व दुष्कर्म टाळावे.<br>शंकरभट्ट सुब्बय्याच्या पत्नीशी व घरच्यांशी बोलताना...<br>...नाडीवाचकाचे कथन व सुबैय्याच्या घरच्यांचे समाधान तिरुपतीच्या रस्त्यावर... | २.पकडून दाढीमिशा काढून तूच पळून गेलेला सुब्बैया आहेस म्हणून तीन दिवस मांत्रिकाद्वारा छळ, मंत्रिकाला शारिरीक व्यथा त्याचे घर जळले. काही दिवसाच्या सहवासानंतर ...<br>एक दिवशी एक जंगम नाडी ताडपट्ट्यातून सांगू लागला की हा शंकर भट्ट आहे तो श्रीपादश्रीवल्लभांचे चरित्र लिहिणार आहे. हा सुब्बैया नाही. तो उद्या परतेल.<br>वेड लागलेला सुबैय्या परतना पत्नीशी भेटला.सर्वांचा गैरसमज नाडीभविष्य पट्टीमुळे संपला. शंकरांना कणिपाक्कमला जायला सुचवले गेले. म्हणून ते परत फिरून चित्तूर गावाजवळ विनायक मंदिरात पोहोचले... |



नाडीग्रंथ ताडपट्ट्यातून भविष्य कथन...



कवड्या टाकून जीवनाडी  भविष्य कथन आजही उपलब्ध आहे...

शंकर भट्ट व सत्तरीचे, तिरुमल रजक धोबी वस्तीतील द्वितीय पत्नीसह राहात होते तर मुलगा रविदास कुरवपुरात श्रींच्या सेवेस असतो.

तिरुपतीहून कणिपाक्कन या  गेले चित्तूरजवळच्या गावात वरदविनायकाचे दर्शन घेतात   .वदरविनायक मंदिराची महती व्हीडिओ पहा. गुंतूर जवळचे मल्लादि हे गाव.

मंदिरातच ४ भीषण कुत्र्यांनी घेरले. पुजाऱ्यांच्या मार्गदर्शनाने ते तिरुमलदासांना भेटायला धोबी धाटावर गेले.

वरदविनायकाची भीषण भविष्यवाणी की मीच गणेश चतुर्थीला दत्तरुपात श्रीपादक्षीवल्लभ या नावाने जन्म घेणार आहे..





तिरुमलदास व शंकर भट्ट दररोजची चर्चा व त्यातून श्रींच्या अवताराची ओळख करून देताना महती वाचकांना होते.... वरदविनायकाची भीषण भविष्यवाणी की मीच गणेश चतुर्थीला दत्तरुपात श्रीपादश्रीवल्लभ या नावाने जन्म घेणार आहे.....

कणिपाक्कम मधील वरदविनायकाच्या प्रत्यक्ष अवतरण्याने चकीत झालेल्या सर्वांसमोर कौशिक गोत्राचे तुम्ही यापुडे मल्लादी आडनाव सोडून श्रीपाद हे नवे आडनाव धारण कराल.

बापन्ना अवधानी श्रीधर अवधानी यांचे मल्लादीहून पीठापुरमला गमन....




।। श्रीपाद श्रीवल्लभांचा जय जय कार असो।।

# श्रीपाद श्रीवल्लभ संपूर्ण चरित्रामधील कथांच्या माहितीचा तक्ता

अध्याय ६, पान ३९. कथाभाग

तिरुमलदास पुढे शंकर व माधव यांना श्रींच्या आठवणी सांगतात.

एकदा श्रींच्या समोर एका योग्याने प्रत्येक माणसाला व देवीदेवतांच्या मूर्तींना प्रभावलय असते ते मी पाहू शकतो. म्हणून पीठापुरतील कुकुटेश्वराच्या मुर्तीचे प्रभावलय व त्यातील रंगछटा पहायला लागला. तिथे त्यांना श्रींची प्रभावळीत निळ्यारंगातून प्रेम व करुणाभाव जाणवला. प्रभावळीच्या रंगभेदांवरून जन्मसिद्ध चातुर्वर्ण्याच्या व्यक्तींचा शोध घेता येईल का? चतुर्वर्ण व्यवस्था कशी निर्माण झाली? अन्य वर्णाच्या लोकांनी उपनयन करावे का? यावर खल होऊ लागला. तेंव्हा श्रींनी म्हटले दुसऱ्याचे प्रभावलय पहायच्या मूर्ख प्रयत्नात व अन्य चर्चात जीवनाचा वेळ व्यर्थ घालवू नका असे सुनावले!नियमनिष्ठेत ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, क्षुद्र समान आहेत. नियमनिष्ठेने आचरण असेल तर त्यांचेही उपनयन करता येईल. ज्ञान सिद्धी मिळवण्यासाठी जाती, वर्ण, कुल, लिंग, वय अशी कुठलीही आडकाठी नसते. अशा चर्चा, वादावादीत निष्णात नरसावधानी नामक बगलामुखीचे उपासक मोडता घालत.




पीठीकापुरचे कुकुटेश्वराचे मंदीर

पान ४१. पुढील कथानकातून बापन्ना अवधानी मल्लादि गाव सोडून कसे आले.

श्रींच्या आईचे वडील बापन्नांना अवधानी जाणकार ज्योतिषी व यज्ञ करण्यात तज्ज्ञ होते. त्यांच्या यज्ञाने पाऊस पडला. पीठिकापुरातील प्रतिष्ठित नरसिंह वर्मांची गाय जवळच्या शामलांबापुरम (सामर्लकोटा) गावातील खाटिकाकडून सोडवली गेली म्हणून सर्वांच्या आग्रहाने ते पीठिकापुरात वास्तवाला आले. शेती करत घरदार करून राहू लागले. त्यांची कीर्ती व प्रतिष्ठा दूरवर पसरली.

त्यांना वेंकावधीनी मुलगा व सुमती नामक मुलगी होती. डौलदार व्यक्तिमत्वामुळे तिला सुमती महाराणी म्हणत. गोदावरी प्रदेशात ऐनविल्ली गावात घंटिगोडा आडनावाचा, अप्पल लक्ष्मीनरसिंह राजशर्मा नामक, भारद्वाज गोत्रीय तरूण राहात असे. पुजा करताना त्याला पीठिकापुरातील बापन्ना अवधानींकडे वेदविद्या शिकायला जायचा आदेश मिळाला. बापन्नांनी त्याला ठेवून घेतला. कालांतराने त्याचा सुमतीराणीशी विवाह झाला. पुढे दोन पुत्र झाले. पण मोठा जन्मजात आंधळा व दुसरा पंगू होता. नंतरच्या वेळी विविध दृष्टांतातून दत्तप्रभू जन्माला येतील असे संकेत मिळत गेले.

ऐनविल्लीहून अप्पळराज चालत पीठिकापुरमला शिक्षणासाठी आले.

तिथे आशुतोष नामक तरुणाने नाडीग्रंथ वाचून सूचित केले की गणेश चतुर्थीच्या उष:काली सिंह गगनात, चित्रा नक्षत्रावर तूला राशीत जन्मलेले बालक दत्तावतारी असेल. ती भविष्यवाणी नंतर खरी ठरून त्याला श्रींच्या आज्ञेने नेल्लूर भागातील पेंचलकोना जवळील कण्व तपोवनात जायला सांगितले. कालांतराने महाराष्ट्रात कण्व मुनींच्या वाजसेनीय शाखेतील माझ्या अवतारात तू पट्टशिष्य होऊन माझ्या अद्भूत लीला प्रत्यक्ष अनुभवशील! असा आशीर्वाद त्यांना मिळाला. गंगाधरसुताला गुरूचरित्र कथन करणारे सिद्ध हे तर ते नव्हेत?




आशुतोष नाडीग्रंथ पट्टी वाचून पेंचलकोना भगातील कण्ववनात तप करायला गेला.

पान ४३. तिरुमलदास शंकरभट्टला सांगतात- श्रीपादांच्या बाललीला- माझी मल्लाद्रिपुरापासूनची जुनी ओळख असल्याने मी बापन्नाच्या व राजशर्मांच्या घरचे कपडे धूत असे. कारणवश मला नरसावधानींचे कपडे धुवायला लागत पण मला ते आवडत नसे. एकदा मुद्दाम नाटक करून माझ्यावर त्यांनी आरोप करून शिक्षा मिळावी म्हणून गाऱ्हाणे नेले, पण माझी निरपराध म्हणून सुटका झाली. नंतरच्या कथाभागात श्रींनी दरिद्री नरसावधीना पुढील जन्मी दरिद्री ब्राह्मणाच्या घरातील तुझ्या अंगणातील भाजी खाईन व पुरलेले धन देईन, वांझ गाईच्या दुधातून तिला पुढील जन्मी मुक्ती देईन, तांत्रिकांला ब्रह्मराक्षसाच्यारुपात मृत करून अनुग्रह करीन म्हणून आश्वासन दिले.

श्रीपाद मला भेटायला धोबीघाटावर येत, म्हणून मी त्यांना विनंती केली की आपण ब्राह्मण आहात आपल्याला असे गल्ली बोळातील वस्तीत येणे शोभा देत नाही. त्यावर श्री म्हणाले, अरे त्या नीच नरसावधानीं ब्राह्मणापेक्षा तू ब्रह्मज्ञानासाठी तळमळणाऱ्ा रजक कुलातील जन्मधारी उत्तम ब्राह्मण तूच आहेस. माझ्या भ्रूमध्यात हस्त ठेवून त्यांनी शक्तीपात केला. माझी कुंडलिनीशक्ती जागृत झाली.



बालयोगी रूपातील श्रींचे पीठापुरातील दर्शन

पान ४९. पुढील कथा भाग उद्या बोलू म्हणून थांबले. नरसावधानींचे नीच पुर्वचरित्र पहिल्या पाढदिवसाच्या दिवशी श्रींनी बापन्नांना आठवण करून दिली की पुर्व जन्मीचे आपण सत्य ऋषी आहात. श्री शैल्य व गोकर्णातील अनिष्ट शक्तींचा नाश करून मला ती अधिक शक्तीशाली करायची आहेत. मी १६ वर्षापर्यंत आपल्या घरी राहीन.



सामलकोटच्या कुकुटेश्वर मंदिराचा परिसर

**श्रीपादवल्लभांची जन्म कुंडली**

दि १७ ऑगस्ट १३२० गणेशचतुर्थीला जन्म उषकाली सिंह लग्नात चित्रानक्षत्रावर.

अ.४ पान २७ वर २५ मे १३३६ श्रींच्या निजगमनाचा दिवस तिरुमलदास म्हणतात की शुभयोगांनी युक्त अति उत्तम आहे. तो कोणत्या कारणांनी यावर तज्ज्ञांनी प्रकाश टाकावा ही विनंती.

| | |
|---|---|
| Date: | August 17, 1320 |
| Time: | 5:50:40 |
| Time Zone: | 5:30:00 (East of GMT) |
| Place: | 82 E 12' 00", 16 N 55' 00"<br>Pithapuram, India, India |
| Lunar Yr-Mo: | Raudra - Bhadrapada |
| Tithi: | Sukla Panchami (Gu) [Vahn:<br>(38.80% left) |
| Vedic Weekday: | Saturday (Sa) |
| Nakshatra: | Chitra (Ma)<br>(13.78% left) |
| Yoga: | Sukla (Ch) (42.64% left) |




।। श्रीपाद श्रीवल्लभांचा जय जय कार असो ।।

# अध्याय 7 खगोल वर्णन - नरसावधानींना श्रीपादांचा आदेश

दिगंबरा दिगंबरा श्रीपाद वल्लभ दिगंबरा ।। श्रीपाद राजं शरणं प्रपद्ये ।। ।दिगंबरा दिगंबरा श्रीपाद वल्लभ दिगंबरा ।।

| अध्याय, पान क्र. चर्चा कोणाकोणात होत आहे? कथानक | स्थळांचा उल्लेख व नकाशा संदर्भ |
|---|---|
| अध्याय ७. पान ५० ...तिरुमलदासआणि शंकर भट्ट हे सकाळी अनुष्ठान आवरून श्रीपादवल्लभ चरितामृतातील सुरस घटना कथन करत आहेत... | खगोल वर्णन - अनेक उपयुक्त माहितीचे भांडार. तिरुपतीहून परत कणिपाक्कम या चित्तूरजवळच्या गावातील रजक तिरुमलदासांच्या घरात चर्चा होत आहे. |
| नरसावधानींना हितोपदेश, (**अधिक माहितीसाठी ज्ञानसागरातील मोती वाचा** ) 'देव भावप्रिय आहे. तो बाह्य उपचारांना महत्त्व देत नाही. ब्रह्मा संबंधित विचारकांसाठी ब्राह्मण असतो. भक्तांच्या योगक्षेमादि रक्षणासाठी क्षत्रिय असतो. सुखशांती देताना सेवाधर्माने वागतो तेंव्हा तो क्षुद्र असतो. जीवांचे पापक्षालन करताना धोबी होतो. मेलेल्या जीवांचे दहन करून त्यांना उत्तम गती देतो तेंव्हा डोंब असतो. देव कुलगोत्र अतीत ८४ आहे.' लोकालोक वर्णन, दत्त म्हणजे कोण? यावरील तू भाष्य ऐकून नंतर 'विस्फोट होऊन नरसंधानी पतीपत्नीसमोरून श्रीपादवल्लभ अंतर्धान पावले. असे तिरुमलदास शंकर भट्टांना सांगते झाले... अध्याय ७ समाप्त ।। श्रीपाद श्रीवल्लभांचा जय जय कार असो ।। |   तिरुपतीहून परत कणिपाक्कमला रजक तिरुमलदास भेटतात. |

# अध्याय ८ दत्तावतात वर्णन - आत्मसाक्षात्कार कसा होतो?

दिगंबरा दिगंबरा श्रीपाद वल्लभ दिगंबरा।। श्रीपाद राजं शरणं प्रपद्ये।। ।दिगंबरा दिगंबरा श्रीपाद वल्लभ दिगंबरा।।

| अध्याय, पान क्र. चर्चा कोणाकोणात होत आहे? कथानक | स्थळांचा उल्लेख व नकाशा संदर्भ |
|---|---|
| अध्याय ८, पान ५८. तिरुमलदास आणि शंकर भट्ट कणीपाक्कम गावातील धोबीघाटापाशी राहणाऱ्या घरात सकाळचे अनुष्ठान संपवून चर्चेला बसतात...<br>विजयानगर साम्राज्याची स्थापना १३३६ मधे झाली.<br>**माधवाचार्य** (इ.स. १२६८ किंवा ११ एप्रिल, इ.स. १२९६ तुंगभद्राजवळचे एक खेडे, कर्नाटक [१] इ.स. १३८६[२]) हे विजयनगर साम्राज्याचे मंत्री असलेले प्रख्यात वेदभाष्यकार सायणाचार्य यांचे सुपुत्र होते. त्यांना सायण माधवाचार्य म्हटले जाते. हरिहर, बुक्क यांनी स्थापन केलेल्या विजयनगरच्या सामाज्यात माधवाचार्य आणि सायणाचार्य हे दोन मंत्री होते, असे म्हणतात. "पंचदशी"कर्ते भारतीतीर्थ म्हणजेच विद्यारण्य असे समजले जाते. | **दत्तावतार वर्णन**<br>आत्मसाक्षात्कार कसा होतो? यावर प्रकाश टाकताना ‘अहं गेल्याशिवाय मोक्ष नाही’ हे समजावून सांगताना ते म्हणाले, 'पीठिकापुरातील स्वयंभू दत्त मूर्तीत देखील श्री बापन्नाचार्यांनी मल्लिकार्जुनाच्या पिंडीसमावेत शक्तिपात केला होता. परंतु अन्नदान करण्याकडे दुर्लक्ष झाले.<br>श्रींचे षोडषावतार, सांगून ते म्हणाले,' कालाग्निशमन दत्त मूर्ती रूपाने अप्पलराज शर्मांकडे अनेक पिढ्या आराधली जाते. ' श्रीपादश्रीवल्लभ गणेश चतुर्थीला अवतरण्याला २४९८वर्षांची पूर्वगाथा आहे. ' 'कैवल्यश्रुंग' या हिमालयातील नेपाळ भूतान यांच्या मध्यावर श्री विश्वेश्वर महाप्रभू रूपात वृद्ध अवस्थेत, कुरवपुरात १६ |

| | |
|---|---|
| | वर्षाच्या बालयती रूपात तर बद्री अरण्यात संजीवनी पर्वताच्या द्रोणागिरीत बाबाजी नावाने एकाच वेळी उपस्थित असतात. |
| **वर्णधर्म लक्षण विवरण, कर्मरहस्य कथन करतात.** शंकर भट्टनी तिरुमलदासांना जाती जमातीच्या अस्तित्वाचा प्रश्न विचारला, त्यावर तिरुमलदासांनी उत्तर दिले, **जात म्हणजे सामुहिक व्यक्तिमत्व. प्रत्येक जातीचा एक आत्मा असतो. त्यात त्या व्यक्तीचे विविध गुण, शक्ती, सामर्थ्य लीन असते. त्याच प्रमाणे गावाचा, शहराचा, देशाचा आत्मा असतो. म्हणूनच आपण आपल्या निवासभूमीला 'भूमाता' म्हणतो.** पंचकन्या विवरण, कर्मचक्र परिणाम, सांगून तिरुमलदासांनी पीठिकापुरात आलेल्या एका सिद्धाचे गर्वहरण करून म्हणाले, 'अरे माधवा, तुझ्या इच्छेनुसार बुक्करायाकडून हिंदू साम्राज्याची स्थापना, मी १६ वर्षांचा झालो की होईल. हरिहर आणि बुक्करायाचा साथीदार म्हणून विद्यारण्य महर्षींच्या नावाने विख्यात होशील. नंतरच्या दशकात तू तुझ्या सायणाचार्य भावाकडे तंजावूर राज्यातील महामंत्री होऊन उत्कर्ष होईल. |  हंपी विजयानगरची राजधानी.. बहामनी व विजयानगरचे साम्राज्य |

सिद्धांनी आनंदून बाळ श्रीपादांना छातीशी कवटाळले. श्रीपादवल्लभ म्हणाले, 'तू श्रृंगेरी मठाचा अधिपती होशील. माझ्या नृसिंह सरस्वती जन्मात कृष्ण सरस्वती नावाने मला संन्यास दीक्षा देशील.'

शंकर भट्टा, या बाबतीत मी तुला उद्या विशेषत्वाने सांगेन.' तिरुमलदासांनी म्हटले. ...

अध्याय ८ समाप्त




।। श्रीपाद श्रीवल्लभांचा जय जय कार असो ।।

# अध्याय 9 कर्मफल मीमांसा

दिगंबरा दिगंबरा श्रीपाद वल्लभ दिगंबरा।। श्रीपाद राजं शरणं प्रपद्ये।। ।दिगंबरा दिगंबरा श्रीपाद वल्लभ दिगंबरा।।

| अध्याय, पान क्र. चर्चा कोणाकोणात होत आहे? कथानक | स्थळांचा उल्लेख व नकाशा संदर्भ |
|---|---|
| **अध्याय ९, पान ६७. कथाभाग - कर्म फल सिद्धांत**<br>गुरुवारी सकाळी तिरुमलदास आणि शंकर भट्ट कणीपाक्कम गावातील धोबीघाटापाशी राहणाऱ्या घरात सकाळचे अनुष्ठान संपवून चर्चेला बसतात आणि ध्यानात असताना सूर्याचा किरण आत प्रवेश करतो. त्या किरणात आम्हाला श्रीपादवल्लभांचे १६ वर्षाच्या यतिरूपात प्रत्यक्ष दर्शन घडून ते दिव्य मंगल रूप क्षणभरात अदृश्य झाले. असे ते म्हणतात. | **प्रसादाचे लोहचणे अक्षरांकित होणे**<br>तितक्यात प्रचंड भयंकर नाद होऊन माझे कान बधिर झाले. आता मी कायमचा बहिरा झालो नाही ना असे मनात आले  हाय राम आता मी काय करू? तिरुमलदासांची बोबडी वळली होती! मी थरथर कापत होतो. घामाने निथळत होतो. श्रीपादवल्लभ अदृश्य रूपाने इथेच आहेत. माझ्या सारख्याला घाबरलेला पाहून मला नक्की शिक्षा करणार, दुर्दैव असे की ते कदाचित तिरुमलदासांकरवी मला कपडे धोपटल्याप्रमाणे दगडावर आपटून बदडून काढतील कि काय? आता कुरवपुर दिवास्वप्न होणार! काहीही असो आपण श्रीपादवल्लभांना शरण जावे. हेच आपल्या हातात आहे! तिरुमलदासांच्या तेजोमय चेहऱ्यावरून मी मलीन रजक आणि ब्राह्मतेजपुंजक खरे ब्राह्मण तिरुमलदास आहेत. असे भासले! काही काळाने ते लोहचणे नैवेद्याच्या चण्यात रुपांतरीत झाले. **पांढरे पत्र नाहीसे झाले. हे सारे अदभूत आणि अगम्य घडले होते.**<br>**...इतक्यात प्रसादाचे लोहचणे तेलुगु लिपीत, 'श्रीपाद राजं शरणं प्रपद्ये' असे अक्षरांकित झाले. एक पांढरे पत्र दिसले. ते पत्र मूळ पत्रापेक्षा पातळ आणि तलम होते. त्यावर काळ्या रंगाच्या तेलुगू लिपीत लिहिले होते, "श्रीकृष्ण निर्वाण ख्रिस्तपूर्व ३१०२ या वर्षी १८ फेब्रुवारी रात्री २ वाजून २७ मिनिटे ३० सेकंदांनी झाले. त्या दिवशी प्रमादि नाम संवत्सर, चैत्र शुद्ध प्रतिपदा, शुक्रवार अश्विनी नक्षत्र होते. श्री कृष्णनिर्वाणानंतर कलियुगाचा आरंभ झाला.** |

# श्रीपाद श्रीवल्लभ संपूर्ण चरित्रामधील कथांच्या माहितीचा तक्ता




शंकरा तुझ्या कुंडलीतील गुरु शत्रू स्थानी आहे. गुरूचा चण्याशी संबंध आहे. गुरूग्रहामुळे येणारी आपत्ती बीजरूपात आहे. त्यास अंकुर फुटू नयेत म्हणून ते लोहचणे करून निवारण केले गेले.
बेटा, शंकर श्रींचे दिव्य चरित्र लिहिण्यासाठी तुझे नियोजन झाले आहे. ते कसे लिहू. कशावर लिहू. त्यावर आपण भाष्य करावे किंवा नाही याची काळजी करू नकोस. श्रींच्या परमभक्तांनी त्यांना आलेले अनुभव कथन केले ते व तुला येणाऱ्या अनुभवांची नोंद तू करत रहा त्यावर भाष्य करायची तुला गरज नाही. श्रींचे चरित्र त्यांच्या लेखणीनेच लिहिले जाणार आहे. त्यामुळे तू चिंता करू नकोस. भविष्यात हे चरित्र कशा प्रकारच्या कागद अथवा अन्य सामुग्रीमुळे दिसेल याची झलक श्रींनी काही मजकूर उमटवून दिली.
तिरुमलदासांनी मला शांत करून म्हटले, 'श्रींची आज्ञा आहे की पुन्हा रजक कुळात गाडगे महाराज म्हणून महाराष्ट्र भागात जन्म घेशील. दीन दुखी जिवाच्या सेवेत तू पुनित होशील. बाळकृष्ण रूपाच्या गोडीमुळे,' तू गोपाला! गोपाला! देवकीनंदन गोपाला! हा मंत्र जपत जगशील. यवनवेषधारी धीशाला (शिर्डी) नगरीतील साईबाबांचा अनुग्रह तुला प्राप्त होईल.'!
अप्पलराज शर्मांच्या वंशात घडलेल्या पापकर्माने श्रींचे वरिष्ठ बंधू श्रीधर राज अंध व श्रीराम राजशर्मा लंगडे जन्मजात आहेत.

**श्रीपादवल्लभ दिव्य स्वरूप**

मानवाला दैवत्वाकडे वळवणे अत्यंत आवश्यक आहे. यासाठी देव आपले देवत्व सोडून थोडा खालच्या पातळीवर उतरतो. यालाच अवतरण म्हणतात. माणूस जेवताना अनेक पदार्थ खातो. ते आपोआप पचून माणसाला शक्ती देतात. जेवण करणे एवढेच त्याचे कर्तव्य. माणसाने खाल्लेले अन्न पचन करून त्याला शक्ती देणे, निरोगी ठेवणे हे शरीराचे कर्तव्य. माणसाला मन असल्यामुळेहे चूक की बरोबर हे ओळखण्याचे स्वातंत्र्य त्याला असते. पण शरीराला ते स्वातंत्र्य नसते. अन्न आवडो अथवा ना

शंकरा तुझ्याकुंडलीतील गुरू शत्रू स्थानी आहे. गुरुचा चण्याशी संबंध. त्यामुळे येणारी आपत्ती बीजरूपाने गुरू ग्रहाची आहे. पुढे यास अंकुर फुटू नयेत म्हणून यांचे लोहचणे करून त निवारण केले गेले.
तिरुमलदासांनी मला शांत करून म्हटले, अप्पलराज शर्मांच्या वंशात घडलेल्या पापकर्माने श्रींचे वरिष्ठ बंधू श्रीधर राज अंध व श्रीराम राजशर्मा लंगडे जन्मजात आहेत.

| | | |
|---|---|---|
| आवडो अन्नपचवून देणे एवढेच त्याचे काम. यालाच प्रयत्नरहीत होणारे स्ययंसिद्ध कार्य म्हणतात. शरीराचा तो विधी निर्णय असतो. सर्व कार्ये संकल्पाशिवाय होत असतात. जसे सूर्योदय, सूर्यास्त, ऋतुचक्र, ग्रह नक्षत्रादिचे भ्रमण ठरल्याप्रमाणेच होणार. ते सृष्टीचे अनुलंघनीय शासन आहे. आपल्या संकल्पाप्रमाणे वागण्याचे सामर्थ्य त्यांना नाही. कलियुगात तंत्र शास्त्राचे वर्चस्व आहे. बऱ्याच गोष्टी यंत्रानी सिद्ध होतात. युगधर्माप्रमाणे यांचे सुलभीकरण होत गेले. माणसाच्या शक्ती, युक्ती कमी होत असल्यामुळे, हे सुलभ करण्याचे विधान ठरवले गेले. ... | | |
| **...पापैया शास्त्री, सुमती अप्पलराज यांचा पूर्वजन्म वृत्तांत,** सच्चिदानंद अवधूतांचे पीठिकापुरात आगमन अवधूत म्हणाले, काही लोकांच्या बहकाव्याने पिठीकापुरवासियांना श्रींना जाणले नाही. मी श्रींचे दर्शन घ्यायला हिमालयातील शतोपथ भागातून कैवल्यश्रुंग स्थानातील विश्वेश्वर प्रभूंच्या आदेशानुसार इथे आलो आहे. आता सुमती आणि अप्पलराज यांचा पूर्वजन्म वृतांत ऐका. हे बालक रूपात श्री दत्त गुरूच आहेत. त्यांनी बृहतशीला नगरीत दिलेल्या वचनानुसार पीठिकापुरात घटना घडत आहेत. या पुढे थोरले बंधू श्रीधर अंधत्वातून मुक्त होऊन कालांतराने महाराष्ट्र देशात सज्जनगडावर समर्थ रामदास नावाने अवतरतील. श्रीपादाला गोदान केल्याचे फळ म्हणून नरसिंह वर्मा कालांतराने हिंदू साम्राज्य स्थापनेसाठी महायोद्धा शिवाजी महाराज म्हणून राजा होतील. श्रीशैल दर्शन करून अनुग्रह मिळवतील. समर्थ रामदास यांचे प्रिय शिष्य म्हणून | शिवाजी त्यांचे गुरु रामदास  | श्रीधर स्वामी  |

राहतील. श्रींचे दुसरे बंधू श्रीराम राजशर्मा अंधत्वातून मुक्त होऊन कालांतराने श्रीधर स्वामी नावाने अवधूत स्वरूपात अवतरतील. ..

**श्रीधर स्वामीजींच्या जीवनातील ठळक घटना**

| | |
|---|---|
| जन्म-लाड चिंचोळी (दत्त जयंती) सायंकाळी ७ वाजता, सन १९०८ | श्री समर्थांच्या आज्ञेप्रमाणे दक्षिणेकडे प्रयाण सन १९३० |
| बालपण व प्राथमिक शिक्षण हैद्राबाद येथे सन १९१२ ते १९२३ | श्री स्वामीजींनी संन्यास आश्रम स्विकारला स्थळ-शिगेहळी सन १९४२ |
| माध्यमिक शिक्षणा करिता पुणे येथे आले सन १९२३ | धर्म जागृती करिता भारत भ्रमण केले सन १९४२ ते १९५८ |
| परमार्था करिता सज्जनगडावर आगमन (विजया दशमी) सन १९२७ | एकांतात राहून दीर्घकाळ तपाचरण केले सन १९५८ ते १९७३ |
| तपःसाधना करुन श्री समर्थकृपा संपादन (दासनवमी) सन १९३० | महानिर्याण (समाधी) चैत्र वद्य द्वितीया सकाळी ९ वा. स्थळ-वरदपूर (कर्नाटक) सन १९७३ |

।। श्रीपाद श्रीवल्लभांचा जय जय कार असो ।।

# अध्याय 10 नरसिंहमूर्तीचे वर्णन

दिगंबरा दिगंबरा श्रीपाद वल्लभ दिगंबरा।। श्रीपाद राजं शरणं प्रपद्ये।। ।दिगंबरा दिगंबरा श्रीपाद वल्लभ दिगंबरा।।

| अध्याय, पान क्र. चर्चा कोणाकोणात होत आहे? कथानक | स्थळांचा उल्लेख व नकाशा संदर्भ |
| --- | --- |
| अध्याय १०, पान ७८. सुब्बय्या आपले पूर्वकथन करतात त्यात दुकानदार म्हणून श्रींच्या वडिलांना नाडून पैसे वसूल करताना पुर्वकर्मात श्रींनी दिलेल्या क्रोधामुळे त्यांना असे गरिबीचे, एकटे, जिणे वाट्याला आल्याचे सांगितले. त्यात कथनातून चिंतामणी या कांचीपुरमच्या वैश्येचा, केरळातील पालेव्वाकाड्डु (पालघाट?) च्या बिल्वमंगल बरोबर अरबी सौदागरांशी घोडे, सुगंधी द्रव्ये, रत्ने यांच्या व्यापारात खोट, एका जटाधारी व्यक्तीला ताम्रपात्र विकून श्रींनी वडिलांना कसे ऋणमुक्त केले याचे कथन करतात. आजोबा बापन्नाचार्य, वेंकटपैय्या श्रेष्ठी नामक मोठे व्यापारी व नरसिंह वर्मा म्हणून क्षत्रिय यांच्या दृढ मैत्रीतून शनिप्रदोषात शिवाराधना करत असत. माझ्या | <br><br>मंगलगिरी पानकल |

पुर्वकर्मातील गैरवर्तनाची शिक्षा म्हणून मला असे झोळीतून खाऊ विकत जगशील असे क्रोधाचे बोल आत्ता सत्य होतात. कालांतराने चिंतामणी वेश्या व बिल्वमंगल वेगळ्या रूपात गुंटूर मंगलगिरी पानकाल नरसिंहस्वामींच्या परिसरात भेटतील. यांना तू पीठिकापुरात आणशील तेंव्हा त्याची खूण म्हणून चित्रवाड( चित्ताड) हे गाव प्रसिद्ध होईल. असे म्हणून सुब्बय्या श्रेष्ठींनी एका मोकळ्या तांब्यातून वरणभात केळीच्या पानावर वाढून जेवायला दिले. त्यामुळे चकीत शंकर भट्ट सुब्बय्यांच्या मुखाने श्रींच्या बालपणातील सुरस कथा ऐकायला तत्पर झाले.

अध्याय १० समाप्त




।। श्रीपाद श्रीवल्लभांचा जय जय कार असो।।